**सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०१८/प्र.क्र.६६/उद्योग-६.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २०१८.

वाचा : १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/२०१८-१९/प्र.क्र.२३/प्रशासन-१, दि.०६/०४/२०१८.

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०२ जून, २०१८

३) अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे क्र. कार्यासन -९/लेखा/५७३८, दिनांक ०१ ऑक्टोबर,२०१८ चे पत्र.

४) अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे क्र. कार्यासन -९/लेखा/५७४०/, दिनांक ०१ ऑक्टोबर,२०१८ चे पत्र.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,मुंबई यांना माहे जून ते सप्टेंबर, २०१८ या चार महिन्यांसाठी ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांसाठी रूपये १६३८.७२ लक्ष व ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांसाठी रूपये ९२.९६ लक्ष असे एकूण १७३१.६८ लक्ष (रूपये सतरा कोटी एकतीस लक्ष अडुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान उपलब्ध करून देण्यात आलेले आहे.

२. अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,मुंबई यांनी त्यांच्या संदर्भ क्र. ३ व ४ च्या पत्रांव्दारे माहे ऑक्टोबर ते नोव्हेंबर, २०१८ या दोन महिन्यांसाठी ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांसाठी रूपये १६३८.७२ लक्ष व ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांसाठी रूपये ८१९.३६ लक्ष व ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांसाठी रूपये ४६.४८ लक्ष असे एकूण रुपये ८६५.८४ लक्ष (रूपये आठ कोटी पासष्ट लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) इतके अनुदान उपलब्ध करून देण्याची विनंती केलेली आहे. मंडळाच्या उपरोक्त विनंतीनुसार रुपये ८६५.८४ लक्ष (रूपये आठ कोटी पासष्ट लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) व ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांखालील सन २०१८-१९ या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर रकमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच

लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८- भाग-१, उपविभाग-१, अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१०२३१२५१०३१११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajiv Madhav Ambikar

Digitally signed by Rajiv Madhav Ambikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4afb47d807935092599a3e28024dd3d3c461bada30a950e81e666a02aad578f5, cn=Rajiv Madhav Ambikar
Date: 2018.10.23 12:54:18 +05'30'

**( राजीव आंबीकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रति :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई .
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).